# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन आदेश क्रमांकः कअनि - १११९/प्र.क्र.४७/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०८ जानेवारी, २०२०

## <u>आदेश</u>

श्री. प्र.वि.कदम, कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या सेवा विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील श्रीसिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई या आस्थापनेवरील उपकार्यकारी अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्ष कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्री.कदम ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर एक वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (प्रशा-१) तसेच विधि व न्याय विभाग यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्री.कदम यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (प्रशा-१) व विधि व न्याय विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री.कदम यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०८१७१२२०८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0,
serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.08 16:57:29 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

श्री. प्र.वि.कदम, कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग /विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२) सह/उप सचिव (आस्थापना), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३) सह/उप सचिव (का.१६), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४) अध्यक्ष, श्रीसिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई.

५) कार्यकारी अधिकारी, श्रीसिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई.

६) निवड नस्ती / संग्रहार्थ.